परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः परिवि-२०२१/ प्र.क्र. (८०/२१)/तांशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ३० सप्टेंबर, २०२१.

संदर्भ :- १. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.उवतंशि/तांशि-१/३३/१४/प्र.क्र(१०७/१३), दि. २९.०७.२०१७.

२. संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. ४/आस्था/परिविक्षा/२०२१/३०७, दि. १७.०६.२०२१.

**शासन आदेश:-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये श्रीमती हर्षा पंकज रेवतकर (मोकदम) यांची सहायक प्राध्यापक, उपकरणीकरण अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव येथे दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीकरीता तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती करण्यात आली होती.

२. तद्नंतर शासन आदेश, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. बदल्या २०१९/ प्र.क्र. (५२/१९)/ तांशि-१, दि.०५.०७.२०१९ अन्वये त्यांची विनंती बदली शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती येथे करण्यात आली असल्याने सद्यस्थितीत त्या शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती येथे कार्यरत आहेत. श्रीमती रेवतकर यांनी परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केला असल्याने, त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण यांच्याकडून संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासनास प्राप्त झाला आहे.

३. शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासंदर्भातील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/ प्र.क्र.३०२/ आठ, दि.२९.०२.२०१६ मधील अटींची पूर्तता श्रीमती रेवतकर यांचे प्रकरणी होत असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी खालील तक्त्यात स्तंभ-५ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ-६ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अध्यापकाचे नाव , पदनाम व कार्यरत संस्था | रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधीतील एकूण रजा कालावधी | परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्रीमती हर्षा पंकज रेवतकर (मोकदम), सहायक प्राध्यापक, उपकरणीकरण अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | ०४.०८.२०१७ (म.पू) | ३२८ दिवस | २६.०६.२०२० (म.नं) | २७.०६.२०२० (म.पू) |

४. संबंधित संस्था प्रमुखांनी उक्त अध्यापकाच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही तातडीने करावी.

५. सदर शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवि-२७१५/ प्र.क्र.३०२/ आठ, दि. २९.०२.२०१६ मधील तरतुदींनुसार व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. परिवि/ २७१५/ प्र.क्र.२०३/ आठ, दि. २५.०८.२०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९३०१२०६४६७५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2021.09.30 12:08:11 +05'30'

**( समीर ढेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**संबंधित अध्यापक (संचालक, तंत्र शिक्षण यांचेमार्फत)**

**प्रत,**

१) संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, अमरावती.
३) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा)- २, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
६) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती (तांशि-१).